**मा.सर्वोच्च न्यायालय, मा.उच्च न्यायालय व मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण तसेच विविध न्यायालयीन प्रकरणांमध्ये प्राप्त होणारे आदेश तसेच नोटीशींवर तात्काळ कार्यवाही करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः न्यायाप्र-२०१५/प्र.क्र.३०८/पापु१५**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१
तारीख: ६ जानेवारी,२०१७

**शासन परिपत्रक:-**

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अधिपत्याखालील निरनिराळ्या कार्यालयांमध्ये मोठ्या प्रमाणात अधिकारी/ कर्मचारी कार्यरत आहेत. या अधिकारी/ कर्मचा-यांच्या सेवाविषयक बाबींची प्रकरणे मोठ्या प्रमाणात पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाकडे आदेशार्थ/ निर्णयार्थ पाठविण्यात येतात. त्यास अनुसरुन अशा अधिकारी/ कर्मचारी यांच्या सेवाविषयक बाबीच्या अनुषंगाने मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण तसेच मा.उच्च न्यायालयामध्ये अनेक अर्ज दाखल होत असतात व त्यामध्ये पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास तसेच विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालय प्रमुखांना प्रतिवादी करण्यात येते. अशा प्रकरणांमध्ये मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण तसेच मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या प्रत्येक आदेशाबाबत विहीत कार्यवाही तात्काळ होणे आवश्यक असते. सदर आदेशाची विहीत मुदतीत पुर्तता न झाल्यास मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणात तसेच मा.उच्च न्यायालयात अवमान याचिका दाखल करण्यात येतात. न्यायालयीन प्रकरणात शासनस्तरावरुन तसेच विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयाकडून होणारा विलंब टाळण्याकरीता करावयाची कार्यवाही तसेच न्यायालयीन प्रकरण उद्भवणार नाही याकरीता घ्यावयाच्या दक्षतेबाबत पुढील सूचना देण्यात येत आहेत.

१) मा.न्यायाधिकरण/न्यायालयाचे आदेश विभागात प्राप्त झाल्यानंतर, नोंदणी शाखेने हे आदेश तात्काळ प्रधान सचिव व संबंधित उप सचिवांच्या निर्देशनास आणावेत.

२) विभागातील तसेच विभागाच्या अधिपत्याखालील अधिकारी/ कर्मचारी यांच्या सेवाविषयक बाबींवर निर्णय घेण्यास/ प्रकरण निकाली काढण्यास विहीत मुदतीपेक्षा अधिक कालावधी लागत असल्यास होणा-या विलंबाबत संबंधित अधिकारी/कर्मचा-यांना विलंबाच्या कारणाबाबत अवगत करण्यात यावे.

३) मा.न्याधिकरणातील मूळ अर्जावर आदेश पारीत करण्यात आल्यानंतर याबाबत अपील करण्याविषयी सादरकर्ता अधिका-यांचे अभिप्राय तात्काळ प्राप्त करुन शासनास सादर करावेत.

४) विभागप्रमुखांनी विभागातील न्यायालयीन प्रकरणांचा मासिक आढावा घेवून याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

५) न्यायालयीन प्रकरणाच्या अनुषंगाने शासनस्तरावरुन मागविण्यात आलेली माहीती तात्काळ शासनास सादर करण्यात यावी. अशी माहिती सादर करण्यास विलंब झाल्यास संबंधित अधिकारी/ कर्मचा-यांवर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

६) न्यायालयीन आदेशाचे अनुपालन करताना सेवाविषयकबाबींबर अनौपचारीक संदर्भ करावा लागत असल्यास अशा प्रकरणात संबंधित विभागाकडून वेळोवेळी पाठपुरवा करुन तातडीने अभिप्राय प्राप्त करावेत.

७) सर्व न्यायालयीन प्रकरणे प्राथम्याने हाताळण्यात यावीत.

८) न्यायालयीन प्रकरणावर कार्यवाही करताना वेळोवेळी संबंधित सादरकर्ता अधिका-यांशी चर्चा करुन त्यानुसार कार्यवाही करावी. आवश्यक तेथे विधी अधिका-यांचा सल्ला घ्यावा.

९) न्यायालयीन प्रकरणे हाताळताना अधिक काळजी घेण्याच्या दृष्टिने प्रत्येक कार्यासन/ कार्यालय प्रमुखांनी स्वतंत्र नोंदवही ठेवणेबाबत मा.न्यायाधिकरणाने मागदर्शन केले आहे. विभागातील संबंधित अधिका-यांनी न्यायालयीन आदेशाची पुर्तता करण्याच्या दृष्टिने संबंधित प्रकरणाची तात्काळ छाणनी करुन प्रकरणाची टिप्पणी शिफारशींसह सादर करावी.

१०) विभागाच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रीय कार्यालयांशी संबंधित कामगार/ औद्योगिक न्यायालये/ महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण/ उच्च न्यायालय तसेच सर्वोच्च न्यायालयातील प्रलंबित असणाऱ्या न्यायालयीन प्रकरणांचा आढावा घेण्यासाठी प्रादेशिक विभागाच्या स्तरावर श्रेणी अ व ब च्या अधिका-यांच्या बाबतीत उपसंचालक / मुख्य अभियंता तर श्रेणी क व त्याखालील कर्मचाऱ्यांच्या बाबतीत वरिष्ठ भूवैज्ञानिक / कार्यकारी अभियंता यांच्या अध्यक्षेतेखाली एक समिती गठीत करण्यात यावी. संबंधित उपसंचालक / मुख्य अभियंता यांनी सदरहू न्यायालयीन प्रकरणांचा दर १५ दिवसांनी नियमित आढावा घ्यावा.

११) मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या आदेशाची पुर्तता करण्यास अधिक कालावधी लागणार असल्यास त्या कारणांची नोंद करुन तसेच सदर प्रकरणातील टप्प्यांची यादी करुन अशा प्रकरणात मुदत वाढ करण्याकरीता प्रकरण सध्या कोणत्या स्तरावर प्रलंबित आहे त्या संपुर्ण तपशिलासह मुख्य सादरकर्ता अधिकारी यांच्यामार्फत मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण यांना विनंती अर्ज सादर करावा.

१२) सदर कार्यपध्दतीचे सर्व संबंधितांनी काटेकोरपणे पालन केले नसल्याचे निदर्शनास आल्यास याबाबत गंभीर दखल घेवून संबंधितावर शिस्तभंगाची कारवाई केली जाईल याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०३१३२३०१३५२८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Bhagwan Sawant

Digitally signed by Mahesh Bhagwan Sawant
DN: CN = Mahesh Bhagwan Sawant, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2017.01.06 14:16:17 +05'30'

**(महेश सावंत)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई .
३. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
४. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था,बेलापूर, नवी मुंबई.
५. उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई (सर्व).
६. अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई (सर्व).
७. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व).
८. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे (सर्व).
९. वरिष्ठभूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व) (संचालनालयामार्फत)
१०. कार्याकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण / जिल्हा परिषद (सर्व).
११. मंत्रालयीन सर्व विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालये
१२. निवडनस्ती (पापु १५)